महाराष्ट्र विधानसभा निवडणूक-२०१९ साठी इतर राज्यांकडून उपलब्ध होणा-या होमगार्ड यांची नियुक्ती करण्यासाठी होणारा खर्च रु.८,७७,०९,७००/- इतक्या रकमेस मान्यता देण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**

**गृह विभाग**

**शासन निर्णय क्रमांक एचजीएस २०१९/प्र.क्र.१३३/विशा-८**

१२ वा मजला, मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२

**दिनांक : १६ ऑक्टोबर, २०१९**

**संदर्भ:-** १.पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य यांच्या कार्यालयाचा क्र.पोमसं/३४/वि.स.नि/होमगार्ड-अग्रिम/४०/२०१९ दि.१५/१०/२०१९

**प्रस्तावना:-**

राज्यात होणारी आगामी विधानसभा निवडणुक-२०१९ सुरक्षितता व शांततेत पार पाडण्यासाठी गुजरात, कर्नाटक, मध्य प्रदेश व तेलंगणा या चार राज्यांच्या गृह विभागास अतिरिक्त पोलीस व होमगार्ड यांचे संख्याबळ पुरविण्याची विनंती करण्यात आली होती. त्यानुसार सदर राज्यांद्वारे २०,००० होमगार्ड पुरविण्यास सहमती दर्शविण्यात आली असून त्यासाठी होणारा खर्च **रु.८,७७,०९,७००/-** इतकी रक्कम आगाऊ अग्रीम म्हणुन उपलब्ध करण्यास मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:-**

राज्यातील आगामी विधानसभा निवडणुक २०१९ सुरक्षित व शांततेत पार पाडण्यासाठी गुजरात, कर्नाटक, तेलंगाणा आणि मध्य प्रदेश या राज्याकडून होमगार्डस मागविण्यात आले होते. त्यानुसार २०,००० इतके होमगार्डस उपलब्ध करुन देण्यास संबंधित राज्यांनी सहमती दर्शविली आहे. तसेच, याकरिता आगाऊ अग्रिम रक्कम देण्याची मागणी केली आहे. या शासन निर्णयाद्वारे संबंधित राज्यांकडुन केलेल्या आकारणीनुसार आवश्यक असलेली एकूण आगाऊ अग्रिम **रक्कम रु.८,७७,०९,७००/- (रुपये आठ कोटी सत्याहत्तर लक्ष नऊ हजार सातशे फक्त)** त्या-त्या राज्यांना अदा करण्यास मंजूरी देण्यात येत आहे.

२. सदर खर्च पोलीस महासंचालक, मुंबई या कार्यालयासाठी सन २०१९-२०२० या आर्थिक वित्तीय वर्षामध्ये “मागणी क्र.बी-१, २०५५-पोलीस (००) (०१) १०९, जिल्हा पोलीस दल (२०५५०१६८)” या शिर्षाखाली “५०” इतर खर्च या लेखाशिर्षांतर्गत खर्ची टाकून सन २०१९-२०२० च्या उपलब्ध अनुदानातुन भागविण्यात यावा.

३. सदर शासन निर्णय वित्त विभागाचे अनौपचारीक संदर्भ क्र.३५५ दिनांक १५.१०.२०१८ यास अनुसरून निर्गमित करण्यात येत असून त्याचा संगणक सांकेतांक **२०१९१०१५१७३५३४२३२९** असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Devendra H Chandel

Digitally signed by Devendra H Chandel
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Home Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=c549ded25d1b7c2e39965e487e51d076e84ce591bc4a9b2667d265c3acc92c34, serialNumber=160effd4b3ee7de44c6eef773c2eb99bb47e324ec7a549a132930080fdff831d, cn=Devendra H Chandel
Date: 2019.10.16 12:34:58 +05'30'

**(देवेंद्र चंदेल)**

**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. महासमादेशक, होमगार्ड, महाराष्ट्र राज्य, मुंबई.

२. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र- १, मुंबई.

३. महालेखापाल (लेखा परीक्षा), महाराष्ट्र- १, मुंबई.

४. अधिदान व लेखाधिकारी, मुंबई.

५. निवड नस्ती, विशा-८, गृह विभाग, मंत्रालय,मुंबई.